महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन
प्राधिकरण अधिनियम, २००५.
नदी-खोरे अभिकरणासाठी विशेष
निमंत्रितांच्या नेमणुकीस मुदतवाढ
देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रः- नदीजो २०११/(८/११)/जसं(आस्था)
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- १० /५/२०११.

**प्रस्तावना :-** वाचा-शासन निर्णय क्रः- नदीजो-२००७/(१७७/०७)/जसंअ दि. १३/०३/२००८.

महाराष्ट्र राज्यामधील जलसंपत्तीचे विनियमन करण्याकरिता,जलसंपत्तीचे कुशल समन्याय व टिकाऊ व्यवस्थापन, वाटप व वापर सुकर करण्याकरिता आणि त्यांची सुनिश्चिती करण्याकरिता कृषी विषयक, औद्योगिक, पिण्याच्या व इतर प्रयोजनांसाठी वापरावयाच्या पाण्याचे दर निश्चित करण्याकरिता महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाची स्थापना करण्यासाठी आणि त्याच्याशी संबधित किंवा तदुनषंगिक बाबींकरिता तरतुद करण्यासाठी सन २००५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-१८ राजपत्रात अधिसूचित करण्यात आला आहे. या अधिनियमातील कलम- ४(१) (घ) मध्ये पुढील तरतुद करण्यात आलेली आहे.

" प्राधिकरणाला धोरणात्मक बाबींवर निर्णय घेण्यास सहाय्य करण्याकरिता प्रत्येक नदी-खोरे अभिकरणाच्या क्षेत्रातून एक याप्रमाणे विहीत केल्यानुसार पाच विशेष निमंत्रित जे अभियांत्रिकी, शेती, पिण्याचे पाणी, उद्योग, कायदा, अर्थशास्त्र, वाणिज्य, वित्तव्यवस्था किंवा व्यवस्थापन यांचेशी संबंधित समस्यांचे पुरेसे ज्ञान, अनुभव असलेले किंवा त्या संबंधातील क्षमता शाबीत केली असेल असे असतील." सन २००५ च्या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-१८ च्या कलम २ (प) नुसार 'नदी खोरे अभिकरण' याचा अर्थ नदी खो-यामध्ये कार्यरत असलेल्या पाच पाटबंधारे विकास महामंडळांपैकी कोणतेही एक असा आहे. त्यानुसार ५ नदी-खोरे अभिकरणामधून विशेष निमंत्रितांची नियुक्ती शासन निर्णय क्र- नदीजो २००७(१७७/०७)/जसंअ दि. १३/०३/२००८ अन्वये करण्यात आलेली आहे. या विशेष निमंत्रितांना मुदत वाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रत्येक नदी-खोरे अभिकरणांमधुन एक अशा एकुण ५ विशेष, निमंत्रितांना महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणावर मुदतवाढ देणे अभिप्रेत आहे. त्याअनुषंगाने प्रत्येक महामंडळातून एक याप्रमाणे नियुक्त करण्यात आलेल्या महामंडळनिहाय तज्ञ व्यक्तींच्या नेमणुकीस मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे - डॉ. सुधीर भोंगळे

२) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद - श्री. वाय. आर. जाधव.

३) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर - ॲड. मधुकर किंमतकर

४) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव - प्रा. आर. डी. राणे

५) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे - डॉ. एस.एस. मगर

सदर निमंत्रितांना दि. १२/०६/२०११ पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून , त्याचा संगणक सांकेतांक २०११०५१०१४४०२२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(प्र.ना.घोडके)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत :-**

मा मंत्री, जलसंपदा (कृखोपाम वगळून) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
मा मंत्री, जलसंपदा (कृखोपाम) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
मा. सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
मा.सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
सचिव , महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
प्रधान सचिव ,पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, ऊर्जा व पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव ,कृषि विभाग मंत्रालय, मुंबई.

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
डॉ. सुधीर भोंगळे,१० योजनबंधा सोसायटी , पौड रोड, शिवतिर्थ नगर, कोथरूड, पुणे - ४११ १०२
श्री. वाय. आर. जाधव, रामायण, विश्वास नगर, नांदेड- ४३१६०२
ॲड. मधुकर किंमतकर, तज्ञ सदस्य, विदर्भ वैधानिक विकास मंडळ, नागपूर
प्रा. आर. डी. राणे, ८ जीवराम नगर, जळगांव- ४२५००१
डॉ. एस. एस. मगर, माजी कुलगुरु, डॉ बा. सा.को. को कृ. वि. दापोली, ह .मु.१७, रुणानुबंध सोसायटी . औध, पुणे- ४११ ००७
जसं(आस्था) कार्यासन संग्रहार्थ.